**पशुसंवर्धन विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन करीता सिंगल नोडल एजन्सी (SNA) व अंमलबजावणी यंत्रणा (IA) यांची राष्ट्रीयकृत बँकेत खाती उघडण्यास मंजूरी देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.७२/पदुम-१६

मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई ४०० ०३२
तारीख: १५ मे, २०२३

**वाचा -**

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.F.No.१(१३)/PFMS/FCD/२०२०, दिनांक २३ मार्च, २०२१
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२१२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दिनांक ०१ जुलै, २०२१
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१४/पदुम-१६, दिनांक ०७ जुलै, २०२१
४) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१४/पदुम-१६, दिनांक ०६ सप्टेंबर, २०२१
५) भारत सरकार, मत्स्यपालन, पशुपालन एवं डेयरी मंत्रालय यांचे पत्र क्र.DO.K-११०५३(५३१३)/३९/२०२२-LH (E-२३०१४), दिनांक ०९ जानेवारी, २०२३
६) भारत सरकार, मत्स्यपालन, पशुपालन एवं डेयरी मंत्रालय यांचे पत्र क्र.R-९९/२/२०२०-small_ruminants(E-१५८८४), दिनांक २४ मार्च, २०२३
७) भारत सरकार, मत्स्यपालन, पशुपालन एवं डेयरी मंत्रालयाचा दिनांक २७.०४.२०२३ रोजीचा ई-मेल
८) पशुसंवर्धन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.एफवायपी २३(२४)/तां-१/सीआर-०९/८१२/२०२३, पसं-६, दिनांक २६.०४.२०२३
९) आयुक्त, पशुसंवर्धन यांचे पत्र क्र.एफवायपी २३(२४)/तां-१/सीआर-०१/९११/२०२३, पसं-६, दिनांक ०४.०५.२०२३

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने दिनांक २३.०३.२०२१ रोजीच्या आदेशान्वये सुधारीत कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन वित्त विभागाने दिनांक ०१.०७.२०२३ च्या शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन बाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार पदुम विभागांतर्गतच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये

पशुसंवर्धन विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांकरीता बँक ऑफ बडोदा या राष्ट्रीयकृत बँकेत सिंगल नोडल एजन्सी (SNA) व अंमलबजावणी यंत्रणा (IA) यांचेकरीता एकूण ४११ स्वतंत्र Zero Balance Subsidiary Account उघडण्यास मंजूरी देण्यात आली आहे. सदर ४११ खात्यापैकी पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण (LH & DC) या योजनेसाठी १ सिंगल नोडल एजन्सी (SNA) खाते व ८९ अंमलबजावणी यंत्रणा (IA) खाती आणि राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत १ सिंगल नोडल एजन्सी (SNA) खाते व ७३ अंमलबजावणी यंत्रणा (IA) खाती उघडण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

२. केंद्र शसनाने संदर्भ क्र.५ व ६ च्या पत्रान्वये तसेच संदर्भ क्र.७ च्या ई-मेल द्वारे पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण (LH & DC) या योजनेंतर्गत ASCAD (६०:४०), ASCAD (५०:५०), ASCAD (१००:००), ESVHD-MVU या उपयोजनांकरिता आणि राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पशुधन आणि कुक्कुट प्रजाती विकास, सेमिनार (६०:४०), गुणवत्ता पूर्ण वैरण बियाणे उत्पादन करीता अनुदान, पशुधन विमा योजनेंतर्गत पशुवैद्यकांचे मानधन, प्रसिद्धी व प्रचार, प्रशिक्षण (१००:००) आणि पशुधन विमा (५०:५०) या उपयोजनांकरिता स्वतंत्र सिंगल नोडल एजन्सी (SNA) खाते व अंमलबजावणी यंत्रणा (IA) खाती उघडण्याबाबत कळविले आहे.

३. त्यामूळे पशुसंवर्धन आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र.८ व ९ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण (LH & DC) या योजनेसाठी उघडण्यात आलेले १ सिंगल नोडल एजन्सी (SNA) खाते व ८९ अंमलबजावणी यंत्रणा (IA) खाती आणि राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत उघडण्यात आलेले १ सिंगल नोडल एजन्सी (SNA) खाते व ७३ अंमलबजावणी यंत्रणा (IA) खाती संबंधित योजनेच्या (६०:४०) बाबीसाठी सुरु ठेवून उर्वरीत बाबींसाठी स्वतंत्र सिंगल नोडल एजन्सी (SNA) खाते व अंमलबजावणी यंत्रणा (IA) खाते उघडण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

पशुसंवर्धन विभागांतर्गतच्या पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण (LH & DC) आणि राष्ट्रीय पशुधन अभियान ((NLM) या योजनांच्या निधी वितरणासाठी बँक ऑफ बडोदा या राष्ट्रीयकृत बँकेत खाली नमुद केल्याप्रमाणे एकूण ०५ Single Nodal Account व अंमलबजावणी यंत्रणा (IA) यांच्याकरीता एकूण २१३ अतिरिक्त स्वतंत्र Zero Balance Subsidiary Account उघडण्यास मंजूर देण्यात येत आहे:-

**(अ) पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण (LH & DC) ASCAD (१००:००)**

१) Single Nodal Account (SNA) : आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) योजना अंमलबजावणी यंत्रणा/Implementing Agency Account (IA) :-

i. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व जिल्हे (३४)

ii. उपआयुक्त पशुसंवर्धन, गुणनियंत्रण प्रयोगशाळा (१)

iii. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, सर्व जिल्हे (३४)
iv. प्राचार्य राज्यस्तरीय प्रशिक्षण केंद्र, गोखलेनगर, पुणे (१)

**एकूण योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agency Account (IA) **संख्या : ७०**

**(ब) पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण (LH & DC) ASCAD (५०:५०)**

१) Single Nodal Account (SNA) : आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) योजना अंमलबजावणी यंत्रणा/Implementing Agency Account (IA) :-
i. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व जिल्हे (३४)
ii. उपआयुक्त पशुसंवर्धन, गुणनियंत्रण प्रयोगशाळा (१)
iii. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, सर्व जिल्हे (३४)

**एकूण योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agency Account (IA) **संख्या : ६९**

**(क) पशु स्वास्थ्य आणि पशु रोग नियंत्रण** (LH & DC) Establishment and Strengthening of existing Veterinary Hospitals & Dispensaries (ESVHD) - Mobile Veterinary Units (Grants forrecurring operational expenses)

१) Single Nodal Account (SNA) : आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) योजना अंमलबजावणी यंत्रणा/Implementing Agency Account (IA) :-
i. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व जिल्हे (३४)
ii. उपआयुक्त पशुसंवर्धन, गुणनियंत्रण प्रयोगशाळा (१)

**एकूण योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agency Account (IA) **संख्या : ३५**

**(ड) राष्ट्रीय पशुधन अभियान ( केंद्र हिस्सा %१००)**

१) Single Nodal Account (SNA): आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) योजना अंमलबजावणी यंत्रणा /Implementing Agency Account (IA):-
i. व्यवस्थापकीय संचालक पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र राज्य मेंढी व शेळी विकास महामंडळ, गोखलेनगर पुणे (१)
ii. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर (१)
iii. महाराष्ट्र पशू व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर (१)
iv. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सर्व जिल्हे (३४)
v. लेखाधिकारी, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे (१)

**एकूण योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agency Account (IA) **संख्या : ३८**

**(इ) राष्ट्रीय पशुधन अभियान (५०% केंद्र हिस्सा व ५० % राज्य हिस्सा )**

१) Single Nodal Account (SNA): आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) योजना अंमलबजावणी यंत्रणा /Implementing Agency Account (IA): १
i. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर (१)

**एकूण योजना अंमलबजावणी यंत्रणा** Implementing Agency Account (IA) **संख्या : १**

२. केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व व्यवस्थापन बाबद केंद्र शासनाने तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१२५५०७७३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Marale Niwrutti Bhaguji

Digitally signed by Marale Niwrutti Bhaguji
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, pseudonym=85DEC352A563C6C48CE612C5F1F3DBE440A34530, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=Marale Niwrutti Bhaguji
Date: 2023.05.15 12:55:40 +05'30'

**( श्री. नि. भा. मराळे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, पशुसंवर्धन विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. महालेखापाल-१ / २ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
३. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त (सर्व), पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई,
५. उप सचिव (पशुसंवर्धन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त/जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. वित्त विभाग (व्यय-२ व अर्थसंकल्प-१५/कोषा प्रशा-५), मंत्रालय, मुंबई-३२,
१०.अवर सचिव (पदुम- ३/पदुम-४/लोलेस -पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवड नस्ती.